स्वयं अर्थ सहाय्यीत विद्यापीठांच्या प्रायोजक मंडळांकडून प्राप्त झालेल्या अनुपालन अहवालाची पडताळणी करण्यासाठी निरीक्षण समिती गठीतकरणेबाबत....

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः स्वअवि-२०१३/(१४१/१३)/विशि-४**
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.
तारीख: ०९ जानेवारी, २०१७

**संदर्भ :-** शासन निर्णय क्रमांक युएसजी-२००६/(२५४/०६)/विशि-४ (भाग-२), दिनांक २९-०५-२०१३.

**प्रस्तावना-**

राज्यात स्वयं अर्थसहाय्यित "सिंबॉयसिस स्किल ॲन्ड ओपन युनिर्व्हसिटी, पुणे" विद्यापीठे स्थापन करण्यासाठी सिंबॉयसिस ओपन एज्युकेशन सोसायटी, पुणे-४११०१६ या प्रायोजक मंडळास शासनाने दि.२६ नोव्हेंबर, २०१५ रोजी इरादा पत्र निर्गमित केले आहेत. प्रायोजक मंडळाने इरादा पत्राच्या अनुषंगाने कार्यवाही करुन अनुपालन अहवाल शासनास दि.२४ नोव्हेंबर, २०१६ रोजीच्या पत्रान्वये सादर केला आहे.

संदर्भधीन शासन निर्णयानुसार निर्गमित करण्यात आलेल्या मार्गदर्शक सूचनांमधील परिच्छेद ७(२) मधील तरतूदीनुसार प्रायोजक मंडळाने अनुपालन अहवाल शासनास सादर केल्यानंतर या अनुपालन अहवालाची पडताळणी करण्यासाठी अनुपालन अहवाल निरीक्षण समिती गठीत करण्याची तरतूद आहे. सदर तरतूदीनुसार प्रायोजक मंडळाने इरादा पत्र निर्गमित झाल्यानंतर इरादा पत्राच्या अनुषंगाने अनुपालन अहवाल शासनास सादर केला आहे. सदर अनुपालन अहवालाचे पडताळणी करण्यासाठी निरीक्षण समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होते. त्यानुसार प्रायोजक मंडळाने सादर केलेल्या अनुपालन अहवालाची पडताळणी करण्यासाठी खालीलप्रमाणे निरीक्षण समिती गठीत करण्यात येत आहे.

**शासन निर्णय-**

| अ.क्र. | नाव | पदनाम |
|---|---|---|
| १ | डॉ.धनंजय येडेकर, माजी कुलगुरु ,स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ, नांदेड | अध्यक्ष |
| २ | श्री.राजेश पांडे, तज्ञ | सदस्य |
| ३ | श्री. दिनेश भोंडे, कुलसचिव, यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठ, नाशिक | सदस्य |
| ४ | सहसंचालक (उच्च शिक्षण), पुणे | सदस्य |
| ५ | सहसंचालक (तंत्र शिक्षण), पुणे | सदस्य |
| ६ | उपसचिव (विद्यापीठ शिक्षण) | सदस्य सचिव |
| ७ | अवर सचिव (विद्यापीठ शिक्षण-४) | समन्वयक |

**समितीची कार्यकक्षा**

१. समितीने अनुपालन अहवाल पडताळणी करण्यासाठी तसेच निरीक्षण करण्यासाठी करण्यात येणा-या कार्यवाहीची व जवाबदारींची यादी सोबत जोडली आहे. सदर यादीतील तरतूदीनुसार समितीने कार्यवाही करावी.
२. समितीने तीचा स्थापनेच्या दिनांकापासून एक महिन्याच्या कालावधीत आपला अहवाल शासनास सादर करणे बंधनकारक राहील. सदर कालावधी जास्तीत जास्त तीन महिन्यापर्यंत वाढविता येईल.
३. समितीच्या पदसिध्द सदस्यांव्यतिरिक्त इतर सदस्यांनाप्रत्येक बैठकीसाठी प्रत्येकी रुपये ५०००/- (रुपये पाच हजार फक्त) इतके मानधन अनुज्ञेय राहील.

४. जे अशासकीय सदस्य मुंबई मधून बैठकीसाठी उपस्थित राहतील त्यांना प्रत्येकी प्रती बैठक रुपये १०००/- (रुपये एक हजार फक्त) इतका प्रवास भत्ता आणि जे सदस्य मुंबई बाहेरुन येतील त्यांना रेल्वेच्या Two Tier AC या दर्जास अनुज्ञेय असलेली रक्कम देय राहील.

५. प्रायोजक मंडळाच्या प्रस्तावित विद्यापीठाच्या प्रत्यक्ष निरीक्षणाच्या वेळी निरीक्षणासाठी जाणा-या सर्व सदस्य / सदस्य सचिव समन्वयक यांना प्रत्यक्ष उपस्थित राहण्यासाठीराज्यस्तर / विभागस्तर / जिल्हास्तरावरील समित्या / मंडळे / आयोग यावर नियुक्त केलेल्या अशासकीय सदस्यांना रु. ८,९००/- व त्याहून अधिक ग्रेड पे असणाऱ्या शासकीय कर्मचाऱ्यांच्या दराने प्रवासभत्ता व दैनिक भत्ता शासन निर्णय दिनांक ०३-०३-२०१० अन्वये अनुज्ञेय करण्यात आला आहे. त्याच दराने उपरोक्त अशासकीय सदस्यांना प्रत्यक्ष निरिक्षणाच्या कामाकरीता प्रवासभत्ता व दैनिक भत्ता अनुज्ञेय राहिल. सदर बाबीवरील खर्चमंजूर अनुदानातून भागविण्यात येईल.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक १०८/व्यय-५, दिनांक ७ फेब्रुवारी २०१४ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०१०९१५३८२६१६०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Siddharth Kharat

Digitally signed by Siddharth Kharat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher And Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=6f8cb55012423727bece629d954713c1ec2962a9ca9b909643170e56321cfd24, cn=Siddharth Kharat
Date: 2017.01.09 16:23:07 +05'30'

**( सिध्दार्थ खरात )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मंत्री (उ.व तं.शि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
२. मा. राज्यमंत्री (उ.व तं.शि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
३. मा. प्रधान सचिव (उ.व तं.शि) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२.
४. डॉ.धनंजय येडेकर, माजी कुलगुरु ,स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ, नांदेड-४३१६०६.
५. श्री.राजेश पांडे, तज्ञ
६. श्री. दिनेश भोंडे, कुलसचिव, यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठ, नाशिक-४२२२२२.
७. सह संचालक (उच्च शिक्षण), पुणे
८. सह संचालक (तंत्र शिक्षण), पुणे
९. सह सचिव (विद्यापीठ शिक्षण), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१०. अवर सचिव (विद्यापीठ शिक्षण-४), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
११ महालेखापाल, (लेखा व परिक्षा-१) / (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई.
१२ संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
१३ वित्त विभाग, व्यय-५/सेवा-५/सेवा-६, मंत्रालय, मुंबई-३२.
१४ रोखशाखा, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२.
१५. निवडनस्ती (विशि-४).